**भारतीय वन सेवेतील सन २०२० च्या तुकडीतील अधिका-यांकरीता “On the Job Training (OJT)” प्रशिक्षण आयोजित करण्याकरीता एक अधिसंख्य पद निर्माण करणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- आयएफएस-५०२२/प्र.क्र.४२/फ-७अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक- १९ मे, २०२२

संदर्भ:- १. पर्यावरण, वने व जलवायु परिवर्तन मंत्रालय, भारत सरकार यांचे अ. शा. पत्र क्र.15011/10/2010-IFS-II, दिनांक १८/०३/२०१६
२. इंदिरा गांधी राष्ट्रीय वन ॲकॅडमी,डेहराडून यांचे पत्र क्र. 2161/NFA-2022/70.21/ (2020-22 Course), दिनांक १४/०३/२०२२.
३. इंदिरा गांधी राष्ट्रीय वन ॲकॅडमी, डेहराडून यांचे पत्र क्र. 11/NFA-2022/70.21 / (2020-22 Course), दिनांक ०४/०४/२०२२.
४. पर्यावरण, वने व जलवायु परिवर्तन मंत्रालय, भारत सरकार यांचे आदेश क्र.17016/24/2021-IFS-I, दिनांक २९/०४/२०२२
५. इंदिरा गांधी राष्ट्रीय वन ॲकॅडमी, डेहराडून यांचे पत्र क्र. 185/NFA-2022/70.21 / (2020-22 Course), दिनांक ०४/०५/२०२२.
६. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. आयएफएस-५०२२/प्र.क्र.४२/फ-७अ, दिनांक ०२/०५/२०२२.
७. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख),म.रा.नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-९/ भावसे/ मेंटर-६/ प्र.क्र.०९ (२१-२२)/२२२/२२-२३, दिनांक ०६/०५/२०२२.

**प्रस्तावना:-**

संचालक, इंदिरा गांधी राष्ट्रीय वन ॲकॅडमी, डेहराडून यांच्या संदर्भाधीन दि.१४/०३/२०२२ व दिनांक ०४/०४/२०२२ रोजीच्या पत्रान्वये कळविल्यानुसार, सन २०२० च्या तुकडीतील ,भारतीय वन सेवेतील महाराष्ट्र संवर्गातील सन २०२०-२०२२ च्या अभ्यासक्रमातील, ०२ (दोन) परिविक्षाधिन अधिका-यांना, इंदिरा गांधी राष्ट्रीय वन ॲकॅडमी, डेहराडून यांना ॲकॅडमी मधून दि. ०६/०५/२०२२ रोजी राज्यात रुजू होण्याकरीता कार्यमुक्त करण्यात येणार असल्याने सदर परिविक्षाधीन अधिकाऱ्यांना १६ आठवड्यांचे **“On the Job Training (OJT)”** करिता कनिष्ठ समय वेतनश्रेणीत (वेतन श्रेणी Level १० in the Pay Matrix) सहाय्यक वनसंरक्षकाची ०२ (दोन) अधिसंख्य पदे निर्माण करण्यास संदर्भाधीन दि. ०२/०५/२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे.

२. संचालक, इंदिरा गांधी राष्ट्रीय वन अकादमी, डेहराडून यांचे दि. ०४/०५/२०२२ रोजीच्या पत्रानुसार आणि केंद्र शासनाच्या पर्यावरण,वने व जलवायु परिवर्तन मंत्रालयाच्या दि. २९/०४/२०२२ रोजीच्या आदेशान्वये सन २०२० च्या तुकडीतील श्रीमती आर्या व्हि.एस. भावसे यांना झारखंड संवर्गातून महाराष्ट्र संवर्गात वैवाहिक कारणास्तव संवर्ग बदल करण्याबाबत परवानगी देण्यात आली

असल्याने त्यांना **"On the Job Training (OJT)"** करीता कनिष्ठ समय वेतन श्रेणीतील सहाय्यक वनसंरक्षक या संवर्गात आणखी ०१ (एक) अधिसंख्य पद निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), म.रा.नागपूर यांनी संदर्भाधीन दि. ०६/०५/२०२२ रोजीआच्या पत्रान्वये प्रस्तावित केलेल्या पदस्थापनेस अनुसरुन तसेच केंद्र शासनाच्या पर्यावरण,वने व जलवायु परिवर्तन मंत्रालयाच्या दि. २९/०४/२०२२ रोजीच्या आदेशान्वये आणि संचालक, इंदिरा गांधी राष्ट्रीय वन अकादमी, डेहराडून यांचे दि. ०४/०५/२०२२ रोजीच्या पत्रानुसार सन २०२० च्या तुकडीतील श्रीमती आर्या व्हि.एस. भावसे यांना झारखंड संवर्गातून महाराष्ट्र संवर्गात वैवाहिक कारणास्तव संवर्ग बदल करण्याबाबत परवानगी देण्यात आली असल्याने त्यांना १६ आठवड्यांचे प्रशिक्षणाकरिता कनिष्ठ समय वेतन श्रेणीतील सहाय्यक वनसंरक्षक या संवर्गात दिनांक ७ मे, २०२२ ते दिनांक २८ ऑगस्ट,२०२२ या कालावधीकरीता आणखी ०१ (एक) अधिसंख्य पद तयार करुन खालीलप्रमाणे पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव | वनवृत्ताचे नाव | वन विभाग |
|---|---|---|---|
| १. | श्रीमती आर्या व्हि.एस. ,भावसे | नागपूर | गोंदिया |

२. सदर अधिसंख्य पद दिनांक ७ मे, २०२२ ते दिनांक २८ ऑगस्ट, २०२२ या कालावधीसाठी अस्तित्वात राहील.

३. श्रीमती आर्या व्हि.एस. ,परिविक्षाधिन भावसे अधिकारी यांचा १६ आठवड्यांचा **"On the Job Training (OJT)"** प्रशिक्षण कार्यक्रम व समन्वय राखण्यासाठी मार्गदर्शक (Mentor) संदर्भाधीन दि. ०२/०५/२०२२ रोजीच्या शासन निर्णयामध्ये नमूद केल्यानुसार राहतील.

४. उक्त अधिका-यांकरीता दिनांक ७ मे, २०२२ ते दिनांक २८ ऑगस्ट, २०२२ या कालावधीकरीताचा सदर पदावरील वेतन व भत्यापोटी येणारा खर्च प्रधानशिर्ष "मुख्य लेखाशिर्ष २४०६-वनीकरण व वन्यजीवन (योजनेत्तर), १०१ वनसंधारण व विकास, १०१ (०१) प्रशासन व संरक्षण (२४०६ ००९६) ०१-वेतन " या लेखाशिर्षाखाली उपलब्ध असलेल्या मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल.

५. सदर शासन निर्णय हा वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. पदनि२०१२/प्र.क्र.६६/१२/ वित्तिय सुधारणा-१, दि. ११ जुलै २०१२ व शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.७/१६/ वित्तिय सुधारणा-१, दि. २० फेब्रुवारी, २०१६ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारांनूसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०५१९१८०२१७२३१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानूसार व नावाने.

RAVIKIRAN
SABAJI GOVEKAR

Digitally signed by RAVIKIRAN SABAJI GOVEKAR
DN: c=IN, o=Personal,
pseudonym=bb348b74c34d5cdc104457bb077cbbab2753fda996136
88793f8ffb2d4595af5,
2.5.4.20=d399ba42648ff6007bc88b201ae47aa7d8a80a09e22cffd4c08
887e4e01ce080, postalCode=416519, st=MAHARASHTRA,
serialNumber=b752370b557d0a3e58b4b069230bc54f6a13d04798d2
ee7a3f1c7dcc5655271c, cn=RAVIKIRAN SABAJI GOVEKAR
Date: 2022.05.19 18:04:31 +05'30'

**( डॉ. रविकिरण गोवेकर )**
**मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)**

**प्रत:-**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री (वने) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. प्रधान सचिव (वने) यांचे स्विय सहायक, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर,
५. संचालक,इंदिरा गांधी राष्ट्रीय वन ॲकॅडमी, डेहराडून,
६. प्रधान मुख्य वनसंरक्षक, (कार्मिक),नागपूर.
७. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, (संशोधन, शिक्षण व प्रशिक्षण) चंद्रपूर.
८. मुख्य वनसंरक्षक, ( शिक्षण व प्रशिक्षण) पुणे.
९. मुख्य वनसंरक्षक नागपूर.
१०.संबंधित परिविक्षाधिन भावसे अधिकारी.
११.महालेखापाल (लेखा व परिक्षा /लेखा व अनुज्ञेयता )मुंबई/नागपूर.
१२.अवर सचिव, कार्यासन /फ-७, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३.जिल्हा कोषागार अधिकारी, गोंदिया.
१४.सहायक संचालक, भावसे/लेखा कक्ष, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. निवडनस्ती, कार्यासन फ-७ अ.